**महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई येथील सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या २७ अस्थायी पदांना सन २०१५-१६ करीता मुदतवाढ मिळणेबाबत-**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१५/प्र.क्र. १२२ / २४ स

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०९ नोव्हेंबर, २०१५

वाचा :-

1. **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस-१००८/प्र.क्र. ५३८/ ५ स, दि. ५ मे, २०११**
2. **सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.आस्थापना/कक्ष-१/पणन महासंघ/मुदतवाढ/१७२/२०१५, दि. २६ फेब्रुवारी, २०१५**
3. **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः सपस- २०१४/ प्र.क्र. १२२ / २४ स, दि. १३ मे , २०१५**
4. **सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.आस्थापना/कक्ष-१/पणन महासंघ/मुदतवाढ/९२०/२०१५, दि.२४ ऑगस्ट, २०१५**

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई येथील सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या २७ अस्थायी पदांना दिनांक ३० ऑगस्ट, २०१५ पर्यंत उपरोक्त वाचा (३) मधील शासन निर्णय दिनांक १३ मे, २०१५ नुसार मुदतवाढ देण्यात आली होती. सदर २७ अस्थायी पदांना दिनांक १ सप्टेंबर, २०१५ ते दि. २९ फेब्रुवारी,२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावाला खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

1. कार्यालय प्रमुखाचे पद वगळून उर्वरित सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असलेली पदे वगळण्यांत यावीत.
2. अस्थायी पदे विहित पध्दतीत भरलेली असावीत.
3. लेखापरिक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

दिनांक १ सप्टेंबर, २०१५ पासून ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सह निबंधक | १ |
| २ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-२ | ४ |
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | ५ |
| ४ | उपलेखापरिक्षक | ५ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | १० |
| ६ | शिपाई | २ |
| | **एकूण** | **२७** |

२. उपरोक्त अटींचे पालन करण्याची जबाबदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त अस्थायी कर्मचाऱ्यांसाठी होणारा खर्च संबंधित सहकारी पणन संस्थांकडून लेखापरिक्षण शुल्काद्वारे वसुल करण्यात यावा.

४. उपरोक्त बाबींवरील खर्च मागणी क्रमांक २४२५-सहकार-१०१-सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण, १०१-(एक)(ए) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५०२२७) या लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावा व त्याखाली सन २०१५-१६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११०१२४९०५६९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Corporation marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Baburao Tumbare
Date: 2015.11.10 12:50:30 +05'30'

**( सु.बा. तुंबारे )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. कृषी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. सह निबंधक ( लेखापरिक्षण),म.रा.सहकारी पणन महासंघ मर्या.,कन्मूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रिट, मसजीद, मुंबई-९
४. विभागीय सहनिबंधक ( लेखापरिक्षण) (सर्व)
५. जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, मुंबई, नागपूर,औरंगाबाद.

६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
८. अधिदान व लेखाअधिकारी, बांद्रा-कुर्ला संकुल, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, औरंगाबाद,
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, ५ स / १२ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.